पेंच प्रकल्पाच्या उजवा कालव्यावरील वडोदा वितरिकेवरील १) गंगा पाणी वापर संस्था २) संत तुकाराम पाणी वापर संस्था ३) उत्कर्ष पाणी वापर संस्था यांचे कार्यक्षेत्रातील वितरण प्रणालीच्या दुरुस्ती व पुनर्स्थापनेच्या कामास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : प्रमा १०१४/(१८३/१४)/लाक्षेवि (कामे)**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: ०९ सप्टेंबर , २०१४

**वाचा**

१) **कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचेपत्र क्र. ६२७१/विपाविम/का.तां. ५/२०१४, दि. ५/८/२०१४.**

**प्रस्तावना**

पेंच प्रकल्पाचे लागवडीलायक क्षेत्र १,२६,९१३ हे असून, त्यापैकी १,१२,६०६ हे क्षेत्रावर मजसुप्र अंतर्गत पुनर्स्थापनेची कामे झाली आहेत. उर्वरीत १४,३०७ हे. लाभक्षेत्राची पुनर्स्थापना टप्प्या टप्प्याने करणे नियोजित आहे. त्यापैकी यापूर्वी २७१३.८६ हे. लाभक्षेत्रावर पुनर्स्थापनेस प्रशासकीय मान्यता दिली आहे. उर्वरीत क्षेत्रापैकी १६०२.७१ हे.क्षेत्राच्या पुनर्स्थापना करण्याचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. पेंच प्रकल्पाच्या राष्ट्रीय महामार्ग क्र.६ च्या खालील लाभक्षेत्रातील वितरण प्रणालीच्या पुनर्बांधणी व नुतनीकरण करण्यासाठीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

या निर्णयाद्वारे पेंच प्रकल्पाच्या उजवा कालव्यावरील वडोदा वितरिकेवरील १) गंगा पाणी वापर संस्था २) संत तुकाराम पाणी वापर संस्था ३) उत्कर्ष पाणी वापर संस्था यांचे कार्यक्षेत्रातील वितरण प्रणालीच्या विशेष दुरुस्ती व पुर्नस्थापनेच्या कामास सोबतच्या परिशिष्टात दर्शविल्याप्रमाणे रुपये ३.३७ कोटी रुपयाच्या कामास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ मधील कार्यवाही पूर्ण करावी

२) प्रशासकीय मान्यता रकमेच्या (रूपये ३.३७ कोटी) मर्यादेतच कामे पूर्ण करणे बंधनकारक आहे.

३) महाराष्ट्र सिंचन पध्दती शंतकऱ्यांकडून व्यवस्थापन कायदा २००५ अंतर्गत पाणी वापर संस्था स्थापन करून कायद्यातील तरतुदीनूसार व महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्पाच्या मार्गदर्शक तत्वानुसार अंदाजपत्रक करून सक्षमस्तरावर मान्यता द्यावी.

४) जुने बांधकाम व नविन बांधकाम यांचे सांधे व्यवस्थीतपणे भरण्यात यावे.

५) पाणी वापर संस्थेच्या अंतिम लाभधारकापर्यंत पाणी निश्चितपणे मिळेल अशा रितीने कामे पूर्ण करावी.

पेंच प्रकल्पाच्या लाभक्षेत्रातील व राष्ट्रीय महामार्ग क्र. ६ च्या खाली पेंच उजव्या कालव्यावरील वडोदा वितरीका कि.मी. ३ ते १० मधील उपरोक्त पाणी वापर संस्थाच्या कार्यक्षेत्रातील कामांच्या खर्चाचे विवरण दर्शविणारा तक्ता.

.

| अ.क्र. | शिर्ष विवरण | अंदाजपत्रक निहाय रक्कम रु. लक्ष | | | एकूण रक्कम रु. लक्ष |
|---|---|---|---|---|---|
| | | गंगा पाणि वापर संस्था, वडोदा | संत तुकाराम पाणि वापर संस्था, वडोदा | उत्कर्ष पाणि वापर संस्था, नान्हा मांगली | |
| १ | मातीकाम | १०८.१०२ | ५.६३३ | ५.९९७ | ११९.८३२ |
| २ | बांधकाम दुरुस्ती, बांधकाम पुनर्बांधणी, नविन बाधकामे | ५१.१२५ | १२.५९० | १६.३९७ | ८०.११२ |
| ३ | प्रवाह मापक यंत्र | ०.४५६ | २.४०६ | ३.१०६ | ५.९६८ |
| ४ | अस्तरिकरण | ५९.४८१ | १०.५२० | ९.३६७ | ६९.३६८ |
| | एकूण | २१९.१६४ | ३१.२४९ | ३४.८६७ | २८५.२८० |
| किरकोळ खर्च ३ % | | ६.५७४ | ०.९३७ | १.०४६ | ८.५५६ |
| व १५ % अनुषंगिक खर्च | | ३३.८६१ | ४.८२८ | ५.३८७ | ४४.०७६ |
| प्रस्तावाची एकूण किंमत | | २५९.५९९ | ३७.०१४ | ४१.३० | ३३७.९१३ |

या कामासाठी होणारा खर्च “४७०१- मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, १९०- सर्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक, विस्तार व सुधारणा कार्यक्रम, ११(०१)विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १५८)” तरतुदीमधून करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१८०४०६१३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Babubhai Galiyal

Digitally signed by Ramesh Babubhai Galiyal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ramesh Babubhai Galiyal
Date: 2014.09.10 17:01:56 +05'30'

( र.बा.गलियाल )
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल १ /२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १ /२ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई,
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद,विधानभवन, मुबई,
५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन मुंबई,
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय,मुबई.
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय,मुबई.
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपुर,
१३.मुख्य अभियता (पा.), व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभिंयता, जलसंपदा विभाग, नागपूर,
१५.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६.माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१७.अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे,
१८. कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, नागपूर,
१९ उप अभियंता, लाक्षेवि(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई,
२० ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२१ लाक्षेवि (कामे) कार्यासन संग्रहार्थ.